**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेत "एक दिवस मजूरासोबत" या संकल्पने अंतर्गत ग्राम रोजगार दिनी विविध उपक्रम राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मग्रारो-२०१५/प्र.क्र.११/रोहयो-६ब**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ११ मार्च, २०१५

**वाचा :**

१) रोहयो विभागाचे शासन परिपत्रक क्र. मगांराग्रारोहयो-२०१३/प्र.क्र.१८६/रोहयो-६ब, दि. ५ सप्टेंबर, २०१४.

**शासन निर्णय :**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत काम करणाऱ्या मजूरांना त्यांच्या हक्काविषयी जाणीव व्हावी तसेच, या योजनेची अंमलबजावणी अधिक पारदर्शक रितीने व्हावी याकरिता ग्राम रोजगार दिनाचे आयोजन प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयातील शनिवारी सकाळी १०.०० ते दुपारी १२.०० या वेळेत करण्याचे निदेश उपरोक्त वाचा येथे नमूद शासन परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत.

ग्राम पंचायत हा महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचा केंद्रबिंदू आहे. या योजनेंतर्गत काम करणारे मजूर संबंधित ग्राम पंचायतींच्या क्षेत्रात राहतात. तसेच, ग्राम पंचायतीमार्फत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेव्यतिरिक्त इतरही योजना राबविण्यात येतात.ग्राम रोजगार दिनाच्या दिवशी ग्रामस्थ,योजनेंतर्गत समाविष्ट असलेले मजूर, क्षेत्रीय अधिकारी व पदाधिकारी एकत्र येतात.त्यामुळे ग्रामीण जनतेस नरेगासोबत इतरही योजनांची माहिती करुन दिल्यास ग्राम रोजगार दिवसाच्या आयोजनाचा अधिक चांगला उपयोग होऊन गावाचा विकास घडविता येईल.

या उद्देशाने रोहयो विभागांतर्गत ग्राम पंचायतीमध्ये आयोजित ग्राम रोजगार दिनाच्या आयोजनात इतर विभागांचा सहभाग घेतला तर महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची अंमलबजावणी अधिक प्रभावीरितीने होऊ शकेल. त्यानुषंगाने, ग्राम रोजगार दिनाच्या दिवशी नरेगा अंतर्गत काम करणाऱ्या मजूरांना त्यांचे हक्कविषयक व अनुषंगिक, अनुज्ञेय लाभ देण्याची कार्यवाही प्राथम्याने करावी. या योजनेंतर्गत नोंदणीकृत मजूरांकरिता तसेच, इतर वैयक्तिक लाभाच्या शासकीय योजनांच्या पात्र लाभार्थ्यांकरिता वर्षातून दोनदा खालीलप्रमाणे विविध उपक्रम आयोजित करण्यात यावे :-

| अ.क्र | आयोजीत करावयाच्या उपक्रमाचे नाव |
|---|---|
| १ | जल व मृदपरिक्षण विषयक सल्ला व मार्गदर्शन करणे. जलसंधारणाच्या कामाविषयी मार्गदर्शन करणे. |
| २ | कामगार कल्याण मंडळाच्या माध्यमातून अनुज्ञेय लाभार्थी तसेच, इतर लाभार्थी यांना राज्य कामगार विमा योजनेचे लाभ देणे, आम आदमी विमा योजनेचे लाभ देणे, पात्र लाभार्थ्यांकडून अर्ज भरुन घेणे व विमाविषयक मार्गदर्शन करणे. |
| ३ | नेत्रतपासणी करुन चश्मे वाटप करणे, मधुमेह, अस्थिरोग तपासणी शिबिर आयोजित करणे व आरोग्यविषयक मार्गदर्शन करणे. |
| ४ | आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, ज्येष्ठ नागरिक ओळखपत्र प्रदान करणे. |
| ५ | जातीचे प्रमाणपत्र, वयाचे व उत्पन्नाचे प्रमाणपत्र, सातबारा उतारे इत्यादी दाखल्यांचे प्रदान करणे. |
| ६ | कृषिविषयक सल्ला व मार्गदर्शन करणे. |
| ७ | वृक्ष लागवड व संगोपन विषयक मार्गदर्शन करणे. |
| ८ | फलोत्पादन विषयक सल्ला व मार्गदर्शन करणे. |
| ९ | जैविक व सेंद्रिय खत निर्मितीविषयक मार्गदर्शन करणे. |
| १० | पशु आरोग्य व देखभाल विषयक मार्गदर्शन करणे. |
| ११ | वैयक्तिक व परिसर स्वच्छता विषयक मार्गदर्शन करणे. |
| १२ | महिला व बाल आरोग्य विषयक सल्ला व मार्गदर्शन करणे. |

ग्रामरोजगार दिनानिमीत्त उपरोक्त उपक्रमांचे आयोजन वर्षातून दोनदा खालील दिवशी करण्यात यावे:-

अ. **दिनांक ३० एप्रिल रोजी** - कामगार दिनाच्या आदल्या दिवशी हा उपक्रम राबवावा.

आ. **दिनांक १ ऑक्टोबर रोजी** - या महिन्यात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत दिनांक २ ऑक्टोबर ते ३१ ऑक्टोबर या कालावधीदरम्यान नरेगा जागृती अभियान राबविण्यात येते. सदर अभियान सुरु होण्याच्या आदल्या दिवशी हा उपक्रम राबवावा.

सदर दिवशी उपरोक्त तक्त्यात नमूद १२ उपक्रमांपैकी कुठलेही ६ उपक्रम दि. ३० एप्रिल रोजी व उर्वरित ६ उपक्रम दि. १ ऑक्टोबर रोजी राबविण्यात यावे. अशा प्रकारे संपूर्ण वर्षात एकूण १२ उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे. याव्यतिरिक्त दरमहा पहिल्या शनिवारी ग्रामरोजगार दिन आयोजीत करण्याची कार्यवाही नियमितपणे सुरु ठेवावी.

ग्राम रोजगार दिनाचे आयोजन खालील मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावे :-

१. उपरोक्त उपक्रम ज्या ग्रामपंचायतींमध्ये नरेगाची कामे मोठया प्रमाणावर हाती घेण्यात आलेली आहेत व **मोठया प्रमाणावर मजूर उपस्थिती** आहे तसेच, ज्या गावांची निवड **जलयुक्त शिवार अभियानांतर्गत** करण्यात आलेली आहे, अशा ग्रामपंचायतीमध्ये प्राधान्याने राबविण्यात यावे. याकरिता ग्राम पंचायतीच्या ठिकाणी **विशेष शिबिराचे** आयोजन करण्यात यावे.

२. ज्या ग्राम पंचायतीं अंतर्गत नरेगाची कामे चालू नाहीत तेथे ग्राम रोजगार दिनाच्या दिवशी नरेगाबाबत जाणीवजागृती करण्यात यावी. सदर उपक्रमांचे आयोजन ग्रामरोजगार सेवकाने संबंधित गावातील ग्रामसेवकाच्या मार्गदर्शनाखाली करावे.

३. संबंधित दिवशी हाती घ्यावयाच्या उपक्रमाचे आयोजन करण्याची जबाबदारी संबंधित यंत्रणेचे **तालुकास्तरावरील प्रमुख अधिकारी** यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

४. ग्राम रोजगार दिनाच्या आयोजनाकरिता उपरोक्त विषयनिहाय शिबिरांचे आयोजन करण्यासाठी तालुकास्तरावर **तहसिलदार व गट विकास अधिकारी, पंचायत समिती** यांनी पुर्वतयारीसाठी संयुक्त बैठकीचे आयोजन करावे. या बैठकीस संबंधित यंत्रणेचे तालुकास्तरीय अधिकाऱ्यांसुध्दा निमंत्रित करण्यात यावे.

५. जिल्हास्तरावरुन ग्राम रोजगार दिनाचे आयोजन यशस्वीरितीने करण्याबाबत संबंधित **जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक** यांनी संयुक्त बैठकीचे आयोजन करुन ही संकल्पना सर्व संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना स्पष्ट करावी. तसेच, जिल्हाधिकारी यांचे स्तरावरुन सर्व जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय यंत्रणांचे प्रमुख अधिकारी, सर्व तहसिलदार आणि गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांना स्वतंत्र पत्रान्वये निर्देशित करण्यात यावे.

६. ग्राम रोजगार दिनी आयोजित करावयाच्या उपक्रमाबाबत ग्राम पंचायत क्षेत्रात येणाऱ्या सर्व गावांमध्ये **आयोजनाच्या दिवसापूर्वी पंधरा दिवस** सर्व ग्रामस्थांना पूर्वसूचना देण्यात यावी व यास व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

७. सदर उपक्रमाच्या दिवशी संबंधित तालुक्यातील **मा. लोकप्रतिनिधी, जिल्हा/तालुका स्तरावरील संबंधित यंत्रणेचे अधिकारी** यांनी उपस्थित राहून मार्गदर्शन करणे अपेक्षित आहे.

८. ग्राम रोजगार दिनाचे आयोजन यशस्वीरितीने पार पाडता यावे याकरिता **पुर्वतयारीची प्रक्रिया साधारणत: १५ दिवस पूर्वीपासून** करण्यात यावी. या पुर्वतयारीमध्ये पात्र लाभार्थ्यांची संख्या निश्चित करणे, त्यांच्याकडून संबंधित उपक्रमाबाबतचे संबंधित विभागाने विहित केलेल्या नमुन्यातील अर्ज भरुन घेणे, अर्जाची पोच देणे, लाभार्थ्यांची नोंदणी करणे, लाभार्थ्यास प्रत्यक्ष लाभ देण्यापूर्वीच्या सर्व औपचारिक बाबींची पूर्तता करणे, कागदपत्रांची पडताळणी करणे, उपक्रमाच्या दिवशी हजर राहणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांची नावे अंतिम करणे, या उपक्रमाची माहिती मा.लोकप्रतिनिधी तसेच, सर्व संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना देणे तसेच, मा. लोकप्रतिनिधी यांना निमंत्रित करणे इ. बाबींचा समावेश आहे.

९. सदर उपक्रमांचे आयोजन करीत असतांना **शिबिरांचे आयोजन, चलचित्रे, दृकश्राव्य माध्यमे, मेळावे, प्रबोधनपर व्याख्याने** या माध्यमांतून करण्यात यावे.

१०. **या उपक्रमांमध्ये खालील घटकांचा समावेश असावा**:-

सामाजिक बांधिलकी जपणाऱ्या व्यावसायिक संस्था (CSR संस्था), स्वयंसहायता बचत गट, NRLM, संबंधित विभागाचे/यंत्रणेचे अधिकारी/कर्मचारी, प्रगतीशील शेतकरी, सामाजिक कार्यकर्ते, अंगणवाडी पर्यवेक्षिका, प्राथमिक आरोग्य केंद्रामधील वैद्यकीय अधिकारी, संबंधित क्षेत्रातील तज्ञ तसेच, स्वयंस्फूर्तीने सहभागी होऊ इच्छिणारे संबंधित विभागातील इतर सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी.

११. **उपक्रमाचा प्रारंभ**:

उपरोक्त कार्यपध्दतीचा अवलंब करुन ग्राम रोजगार दिनाचे आयोजन प्रत्येक जिल्हयात करण्यात यावे. याकरिता प्रत्येक जिल्हयातील निवडक ग्रामपंचायतीं मध्ये अशा उपक्रमाचे आयोजन करण्यात यावे. यावेळी कार्यक्रमाचे आयोजन करुन त्या कार्यक्रमास संबंधित जिल्हयाचे मा. पालकमंत्री व इतर मा. लोकप्रतिनिधी यांना निमंत्रित करण्यात यावे. ही कार्यवाही जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक यांचेवर सोपविण्यात येत आहे.

१२. **विभागस्तरीय पर्यवेक्षण** :-

संबंधित महसुली विभागाचे उपायुक्त (रोहयो) यांनी त्यांच्या अधिनस्त सर्व जिल्हयांमध्ये उपरोक्त नमूद दिवशी उपक्रमांचे आयोजन होत आहे की नाही याचा जिल्हानिहाय आढावा घेऊन अहवाल शासनास तसेच, आयुक्त नरेगा, नागपूर यांना सादर करणे बंधनकारक आहे.

१३. **निधीची उपलब्धता:-**

ग्राम रोजगार दिनाचे आयोजन व पूर्वतयारी उदा. प्रसिध्दीसाठी आवश्यक साहित्य खरेदी वगैरे यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रत्येक जिल्हयाकरिता रुपये ३.०० लक्ष (अक्षरी रुपये तीन लक्ष फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे. हा निधी नियोजन विभाग, मागणी क्र. ओ-३, मुख्य लेखाशीर्ष २५०५-ग्रामीण रोजगार, ६०, इतर कार्यक्रम, ००१-रोजगार हमी योजना-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१) (०१) रोजगार हमी योजना,२६ जाहिरात व प्रसिध्दी (२५०५००२२) " दत्तमत " या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तिय वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१२११४३१००६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vimala R

Digitally signed by Vimala R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vimala R
Date: 2015.03.12 11:53:26 +05'30'

**(आर. विमला)**

**उप सचिव (रोहयो), नियोजन विभाग**

**प्रत,**

१. मा. मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव (ग्राम विकास, ग्रा.वि. व पं.रा. विभाग, मंत्रालय, मुंबई) यांचे स्विय सहाय्यक
३. सचिव (रोहयो) यांचे स्विय सहाय्यक
४. आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
५. आयुक्त, मग्रारोहयो आयुक्तालय, नागपूर
६. सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मुंबई शहर व उपनगर वगळून)
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक, जिल्हा परिषद.
८. सर्व उप आयुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालय
९. सर्व उप जिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय
१०.सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद
११.उप सचिव, जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व उप सचिव, अवर सचिव, सहायक संचालक (लेखा), कक्ष अधिकारी, सांख्यिकीय अधिकारी, रोहयो प्रभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती.

## परिशिष्ट

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | मंजूर रक्कम (अंकात) | मंजूर रक्कम (अक्षरी) |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २ | रायगड | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३ | रत्नागिरी | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ४ | सिंधुदूर्ग | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ५ | नाशिक | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ६ | धुळे | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ७ | नंदुरबार | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ८ | जळगाव | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ९ | अहमदनगर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १० | पुणे | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ११ | सातारा | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १२ | सांगली | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १३ | सोलापूर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १४ | कोल्हापूर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १५ | औरंगाबाद | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १६ | जालना | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १७ | परभणी | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १८ | हिंगोली | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| १९ | बीड | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २० | नांदेड | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २१ | उस्मानाबाद | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २२ | लातूर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २३ | बुलढाणा | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २४ | अकोला | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २५ | वाशिम | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| २६ | अमरावती | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २७ | यवतमाळ | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २८ | वर्धा | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| २९ | नागपूर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३० | भंडारा | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३१ | गोंदिया | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३२ | चंद्रपूर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३३ | गडचिरोली | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| ३४ | पालघर | ३.०० लक्ष | रुपये तीन लक्ष फक्त |
| | **एकूण** | **१०२.०० लक्ष** | **रुपये एकशे दोन लक्ष फक्त** |